**पुणे फिल्म फाऊंडेशनमार्फत, आयोजित "२३ वा पुणे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव" आयोजनासाठी दुसऱ्या टप्प्यातील अर्थसहाय्य मंजूर करण्यास वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आंचिम-२०२४/ प्र.क्र.८८/सां.का.१**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०२५

**वाचा :** १. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.आंचिम-२०२३/प्र.क्र.१२४/सां.का.१, दि.११ मार्च, २०२४.
२. सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, मुंबई यांचे दि. ०५ डिसेंबर, २०२४ रोजीचे पत्र
३. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.आंचिम-२०२४/प्र.क्र.८८/सां.का.१, दि. १२ डिसेंबर, २०२४.
४. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.आंचिम-२०२४/प्र.क्र.८८/सां.का.१, दि. १२ फेब्रुवारी, २०२५.

**प्रस्तावना :**

आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाचे आयोजन करण्यास्तव उपनिर्दिष्ट १ शासन निणर्यामधील नमूद संस्थांना अनुदान देण्यात येते. सदर शासन निर्णयात पुणे फिल्म फाऊंडेशन, पुणे या संस्थेमार्फत आयोजित "पुणे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव" या महोत्सवाचाही समावेश आहे. सदर महोत्सवाच्या आयोजनास्तव रुपये ७०.०० लक्ष इतके अर्थसहाय्य देण्याची तरतूद आहे.

तथापि, पुणे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव आयोजनास्तव एकूण रुपये ४.०० कोटी इतका निधी वितरित करण्याचे तत्कालिन मा. उपमुख्यमंत्री (नियोजन व वित्त) यांनी सुचित केले होते. त्यामुळे, वित्त विभागाकडे रुपये ३.३० कोटी इतक्या अतिरिक्त निधीची मागणी माहे जून, २०२४ पुरवणी मागणी करण्यात आली. सदर पुरवणी मागणी मान्य झाली. संदर्भ क्र. ३ अन्वये रुपये ३.६८ कोटी इतका निधी पुणे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाच्या आयोजनास्तव "पुणे फिल्म फाऊंडेशन" या संस्थेस वितरित करण्यात आला असून संदर्भ क्र. ४ अन्वये ऊर्वरित निधी रुपये ३२.०० लक्ष इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आता, सदर ऊर्वरित निधीस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:**

पुणे फिल्म फाऊंडेशन या संस्थेमार्फत आयोजित करण्यात येणाऱ्या "२३ वा पुणे आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव" या महोत्सवासाठी शासनातर्फे दुसऱ्या टप्प्यातील रुपये ३२,००,०००/- ( रुपये बत्तीस लक्ष फक्त ) इतक्या रकमेच्या निधीची प्रतिपूर्ती महामंडळास करण्यासाठी खालील अटींच्या अधिन राहून वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

१. मंजुर केलेले अर्थसहाय्य हे मुंबई वित्तीय नियमानुसार अनुज्ञेय राहील.
२. मंजुर केलेले अर्थसहाय्य हे अनावर्ती असेल व शासनाच्या नेहमीच्या अर्थसहाय्यासंदर्भातील अटी व शर्ती यांच्या अधिन राहून असेल.

३. अर्थसहाय्याचा विनियोग केवळ मंजूर केलेल्या प्रयोजनार्थ व तात्काळ करण्यात यावा. तसे न केल्यास अर्थसहाय्याची रक्कम प्रचलित बँकेच्या व्याजदरासह शासनास परत करणे बंधनकारक राहील.

४. चित्रपट महोत्सवाचा समारोपानंतर किमान ३ महिन्यात उपयोगिता प्रमाणपत्र, जमा-खर्चाचा तपशिल (Profit and Loss Account) व खर्चाचा ताळेबंद (Balance Sheet) सादर करणे बंधनकारक राहील.

५. सदर महोत्सवात प्रदान करण्यात येणाऱ्या पुरस्कार / सन्मान समितीवर शासनाचा किमान एक प्रतिनिधी संस्थेने नेमणे आवश्यक राहील.

६. महोत्सव संपन्न झाल्यानंतर विस्तृत अहवाल महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव यांना १ महिन्याच्या आत सादर करणे बंधनकारक राहिल.

७. चित्रपट महोत्सवाची जाहिरात, निमंत्रण पत्रिका इत्यादी माध्यमातून “सांस्कृतिक कार्य विभाग, महाराष्ट्र शासन” यांच्या सहकार्याने असा ठळक उल्लेख करणे आवश्यक आहे. महाराष्ट्र शासनाचा सहयोग महोत्सवाशी संबंधित सर्वांना तसेच प्रसार माध्यमांना देखील स्पष्टपणे समजेल, अशा पध्दतीने आयोजकांनी महोत्सवपूर्व व महोत्सवादरम्यान विशेषत्वाने अधोरेखित करावा.

८. आयोजक संस्थेला शासन निर्णय दि.११ मार्च, २०२४ अन्वये घोषित धोरणातील सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणे बंधनकारक राहील.

९. वरील सर्व नियमातील बदल, सुधारणा किंवा अर्थ लावणे याबाबतचे पूर्ण अधिकार शासनास राहतील व याबाबत शासनाने दिलेले आदेश अंतिम व संबंधितांवर बंधनकारक राहतील. तसेच याबाबत करारावर स्वाक्षरी करणाऱ्या दोन्ही पक्षात वाद झाल्यास वादाचे निराकरण करण्याकरीता अपर मुख्य सचिव ( पर्यटन व सांस्कृतिक कार्य ) यांचा लवाद नेमण्यात येऊन त्यांनी दिलेला निर्णय अंतिम तसेच दोन्ही पक्षांवर बंधनकारक राहील. तथापि, लवाद नेमल्यास कोणत्याही पक्षास न्यायालयात जाण्याची मुभा नाही. वरील अटी-शर्तीसह करार करण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

१०. विभागाच्या योजनांची प्रसिध्दी होईल याची व्यवस्था सदर महोत्सवांतर्गत संस्थेने करणे बंधनकारक राहिल.

**०२.** या प्रयोजनार्थ वितरित निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागास सादर करणे बंधनकारक राहिल. यासाठी, उप सचिव (रोखशाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून अवर सचिव (रोखशाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई यांना सदर रक्कम एकरकमी वितरित करावी. यासाठी, उप सचिव (सां.का.१) हे पर्यवेक्षीय अधिकारी राहतील.

**०३.** यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती (००) १०२, कला संस्कृती प्रचालन (०३) (०६) आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव (२२०५ १५८१),३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान सशर्त आहे.

०४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१७०/२०२५/व्यय-१५, दि.१९ मार्च, २०२५ अन्वये आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२४४/२०२५/व्यय-१५, दि.२८ मार्च, २०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२ फेब्रुवारी, २०२५ अन्वये विहित अटी व शर्ती पूर्ततेच्या अधिन मान्यता देण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३३०१५४५०७६७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2025.03.30 15:46:48 +05'30'

( सुमंत दि. पाष्टे )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव
२. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-एक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल ( लेखापरीक्षा )-एक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
८. नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग (व्यय-१५, अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
१०. अध्यक्ष, पुणे फिल्म फाऊंडेशन, फ्लॅट नं.१, सरजाई बिल्डींग, साईबाबा मंदिर जवळ, मुकुंद नगर, पुणे
११. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - यांना विनंती करण्यात येत आहे की, उक्त अनुदानाची रक्कम उपलब्ध करुन देण्यात यावी.
१२. अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी महामंडळास निधी वितरणाची कार्यवाही करावी.
१३. निवड नस्ती - सां.का.१